**प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजनांकरीता विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर पीएफएमएस बँक खाते उघडण्यास कार्योत्तर मंजूरी प्रदान करण्याबाबत व सदर योजनांकरीता चेकर व मेकर यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीएफएम-२०१७/प्र.क्र.४५/१७/भाग-१/२-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २८ ऑगस्ट, २०२०.

**संदर्भ:**

१. कृषि व पदुम विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २७ सप्टेंबर, २०१७.
२. कृषि व पदुम विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २९ सप्टेंबर, २०१७.
३. शासन पत्र क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१८७/११-अे दि. ०५ ऑगस्ट, २०२०
४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय यांचे पत्र क्र. जा.क्र.कृआ/सां.५/टी.आर.अे/१९५८९/२०२० दि. २० ऑगस्ट, २०२०

**प्रस्तावना :**

कृषि विभागाच्या ११ योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे (PFMS) राबविण्यासाठी एकूण ३५१ बँक खाती उघडण्यास संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे. या अनुषंगाने प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (२४०१ २५६९) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना (२४०१ २५७८) (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) या योजनांसाठी आयुक्तालय स्तरावर व जिल्हास्तरावर पीएफएमएस बँक खाते उघडण्यास शासनमान्यता देण्यात आली आहे. तथापि, या योजनांकरिता विभागस्तरावर बँक खाते उघडण्याबाबत शासनमान्यता देण्यात आलेली नाही.

२. सदर योजनांतर्गत प्राप्त अनुदान हे आयुक्तालय स्तरावरुन फक्त आयुक्तालय स्तरावर व सर्व विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर वितरित करण्यात येते असल्याने विभागस्तरावर उघडण्यात आलेल्या बँक खात्यांना कार्योत्तर मंजूरी देण्याची तसेच सदर योजनांसाठी विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी ह्यांची मेकर व विभागीय कृषि सहसंचालक ह्यांची चेकर म्हणून नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे शासन निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

कृषी विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनांकरिता एकूण ८ विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर विभागीय कृषि सहसंचालक यांच्या नावे प्रत्येकी १ असे अशी एकूण ८ बँक खाती उघडण्यास शासनस्तरावरुन कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर योजनांकरीता विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर पीएफएम प्रणालीद्वारे बँक खात्यातील व्यवहार करण्यासाठी विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी हे मेकर (Maker) म्हणून व विभागीय कृषि सहसंचालक हे चेकर (Checker) म्हणून जबाबदार असतील.

२. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचना आणि अटी व शर्तींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२८१२१६०१९३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.08.28 12:41:28 +05'30'

**( डॉ. सुग्रीव धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
४. कृषि सहसंचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई,
६. सहसंचालक (सुधारणा ) संचालनालय,लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८. महालेखाकार कार्यालय, मुंबई /नागपूर.
९. सहसचिव / उप सचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी (का ११-अे ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सहाय्यक संचालक (लेखा-१/२), कृषि आयुक्तालय, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय - २ / अर्थ - १३/ कोषा प्रशा-५), मंत्रालय, मुंबई.
१२. लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे.
१३. उप महाप्रबंधक, डिजिटल आणि लेणदेण बँकींग शासकिय व्यावसायिक विभाग, सायनरजी सी-६/जी ब्लॉक बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा पूर्व मुंबई- ४०० ०५१.
१४. निवड नस्ती ( कार्यासन २-अे ).